82D.F0JHPA\R82.663

औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह येथे कर्मचारी व
अधिकारी वर्गाकरीता २४२ निवासस्थाने
बांधण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्र. बीएलडी ३५९८/प्र.क्र.२१/पिआरएस-२
मंत्रालय, मुंबई- ४०००३२. दिनांक :- १७ जुलै, २००३.

__पहा:-__ १) कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे क्रमांक बीएलडी/१६९८/११२६/कक्ष-३ दिनांक २२.४.१९९८.

२) कारागृह महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य पुणे यांचे दुसरे पत्र क्र. : बीएलडी/१६९८/११२६/४६८/ कक्ष-३ दिनांक १०..१.२००३.

३) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक :विअप्र१०००/प्र.क्र.४६/२००१/विनिमय दिनांक: ११/७/२००१.

__शासन निर्णय:-__ औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहाच्या परिसरात सध्या अस्तित्वात असलेली कर्मचारी निवासस्थाने ही अतिशय जुनी असून त्यात आता वास्तव्य करणे अतिशय धोकादायक आहे. अशा धोकादायक इमारतीमध्ये राहणा-या कर्मचारी व अधिकारी यांच्या व त्यांच्या कुटुंबयांच्या जिवास केव्हाही धोका निर्माण होऊ शकतो. हा धोका टाळण्याकरीता सध्याची निवासस्थाने पाडून त्याच ठिकाणी नविन निवासस्थाने बांधण्यास येणा-या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता मंजूर करावी अशी कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास विनंती केली आहे.

२. औरंगाबाद मध्यवर्ती कारागृहाच्या परिसरात कर्मचारी /अधिकारी यांच्या करीता २४२ निवासस्थाने बांधण्यास येणा-या खर्चाचे रु. ९.३० कोटी ( रुपये नऊ कोटी तीस लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या अंदाज पत्रकास व बांधकामाच्या आराखडयास ( नकाशे) मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी सक्षम अधिकारी म्हणून प्रमाणित केले असुन या निवासस्थानाच्या बांधकामाची निकड लक्षात घेऊन प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मंजूर करावी अशी कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास विनंती केली आहे.

३. औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह येथे अधिकारी व कर्मचारी यांचे करीता २४२ निवासस्था बांधण्याच्या प्रस्तावाचा समावेश केंद्रपुरस्कृत (७५.२५) कारागृह सुधारणा योजना या योजनेत योजनेतर्गत केलेला असून सदर बांधकामाच्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशास प्रशासकीय मान्यता देण्यासंबंधीचा प्रस्ताव काहीकाळ शासनाच्या विचाराधीन होता, त्यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करुन शासन वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८भाग पहिला, उपविभाग , तीन, च्या परिशिष्टातील अनुक्रमांक ४,परिच्छेद क्रमांक २७(२) व रकाना क्र. ५ व ६ मधील अटींच्या अधीन राहुन तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र१०००/प्र.क्र.४६/२००१ विनिमय, दिनांक ११.७.२००१ व्दारे मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन शासन या आदेशाव्दारे रु.

१,३०,०००००/- च्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या आराखडयास प्रशासकीय मान्यता मंजूर करीत आहे. तथापि अर्थसंकल्पात तरतूद उपलब्ध झाल्याशिवाय हे बांधकाम करण्यात येऊ नये.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी५ मुख्यलेखाशिर्ष " २०५६ - तुरुंग- १०१ तुरुंग केंद्र पुरस्कृत योजना (००) (०१) कारागृह सुधारणा योजना ( २०५६ -०१८- १) योजनेत्तर /दतमत" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ सीआर६४४/व्यय-८ व प्र.क्र.६३०/अर्थ-१० दिनांक १८.६.२००३ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

( र.ना. माळी)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति.

कारागृह महानिरीक्षक, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य पुणे
कारागृह उप महानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य पुणे
कारागृह उप महानिरीक्षक . (मध्य विभाग) औरंगाबाद, मध्यवर्ती कारागृह औरंगाबाद.
अधीक्षक, औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह औरंगाबाद
अधीक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग औरंगाबाद.
कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग मंडळ, औरंगाबाद.
महालेखापाल महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा ) ( लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
महालेखापाल महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा ) ( लेखा व अनुज्ञेयता) ,नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे ,औरंगाबाद.
वित्त विभाग- व्यय-८ व अर्थ-१०, मंत्रालय, मुंबई
सार्वजनिक बांधकाम विभाग इमा-२ व अर्थ-२ मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव गृह विभाग ( जियुडी-१) मंत्रालयासमोर मुंबई.
गृह विभाग, निवड नस्ती, पीआरएस-२